**• इसाक मुजावर**

# हम ना तुम्हे भुलायेंगे

दोन जानेवारीला अण्णाना पाहायला के. ई. एम.मध्ये गेलो होतो तेव्हाच मनात कोठे तरी अशुभाची पाल चुकचुकली होती. अण्णांची परिस्थिती तेव्हा तशी 'क्रिटीकल' होती आणि ती पाहून येणाऱ्या अशुभ घटनेची चाहूल लागली होती. वाटू लागले होते आता काही खरं नाही. के. ई. एम.मधून परतताना मन अस्वस्थ झाले होते. पण ते कितीही अस्वस्थ झाले तरी आता काही म्हणजे काही उपयोग नव्हता. मन घट्ट करून येणाऱ्या अशुभ घटनेची वाट पाहत थांबणे एवढेच आता आपल्या हातात उरले होते. बातमी कोणत्याही क्षणी अपेक्षित होती.

आता ती बातमीही आली आहे. भारतीय चित्रपटव्यवसायातील एक ज्येष्ठ संगीतकार सी. रामचंद्र यांचे दुःखद निधन. येत्या १२ जानेवारीला अण्णांचा वाढदिवस होता. ६३ वर्षे मागे टाकून अण्णा ६४ व्या वर्षात पदार्पण करणार होते. पण ६४ वा वाढदिवस पाहण्याचे भाग्य काही त्यांना लाभले नाही. तद्पूर्वीच ५ जानेवारीला त्यांचे दुःखद निधन झाले आहे. पण ६४ वा वाढदिवसच नव्हे तर १९८२ साल पाहण्याचे भाग्य तरी अण्णांना कोठे लाभले आहे! बावीस डिसेंबरला अण्णांना के. ई. एम्.मध्ये दाखल करण्यात आले आणि २७ पासून ते कोमातच गेले. या कोमातच त्यांचा अंत झाला. यामुळे ५ जानेवारीपर्यंत ते आपल्यात असले तरी उगवत्या ८२ वर्षाची चाहूलही त्यांना लागली नाही. यावर्षी अण्णा नवे वर्ष साजरे करायला कोवाडला जाणार होते. आणि तेथे रणजित देसाईंच्या संगतीत मैफल रंगवून नव्या वर्षाचे स्वागत करण्याची तयारी त्यांनी चालवली होती. ही तयारी करताना नव्या वर्षाच्या स्वागताविषयी अण्णांनी कितीतरी मनसुबे रचले असतील. पण एका बाजूला हे मनसुबे ते रचत असताना दुसऱ्या बाजूला काळाने मात्र त्यांचा कायमचा निरोप घ्यायची तयारी चालवली होती. यामुळे रणजित देसाई यांच्या संगतीत नव्या वर्षाचे स्वागत करण्याचे त्यांचे ते मनसुबे हवेत विरून गेले आणि या जगातूनच ते कायमचे अदृश्य झाले. बातमी तशी अपेक्षितच होती. यामुळे ती ऐकून एकदम धक्का बसला नाही. पण मनाला आलेली एक प्रकारची मरगळ मात्र काही केल्या जायला तयार नाही. मनाच्या या मरगळलेल्या अवस्थेतच अण्णाचे एक गाणे आज आठवू लागले आहे 'शगुफा' या चित्रपटातील 'अपना पता बता दे, या मेरे पास आना ऽऽ.' पूर्वी अण्णा शिवाजी पार्कला साईप्रसादमध्ये राहायचे. तेथून ते सांताक्रूझला 'सरगम' या आपल्या नव्या बंगल्यात राहायला गेले. आणि तेथून पुन्हा शिवाजी पार्कला 'साई सावली' या नव्या इमारतीत राहायला आले. तेव्हा प्रत्येक वेळी 'शगुफा'-मधील त्यांच्या 'अपना पता बता दे ऽऽ' या गाण्याची त्याना आठवण देऊन त्यांचा पत्ता मी त्याना विचारला होता. आणि प्रत्येक वेळी आपला नवा पत्ता त्यानी मला दिला होता. आजही वाटू लागलंय 'शगुफा'मधील ते गाणे पुन्हा गुणगुणावे. आणि अण्णांना त्यांचा नवा पत्ता विचारावा. पण नाही. आता काही उपयोग नाही. प्रत्येक वेळी जागा बदलताना अण्णांनी आपला नवा पत्ता मला दिला असला तरी आताचा आपला नवा पत्ता मात्र ते देऊ शकणार नाहीत. कारण पत्ता द्यायला त्यानी आता केवळ जागाच सोडलेली नाही. हा इहलोकच सोडला आहे. माणूस जेथून कधीच परत येत नाही अशा परलोकात आता ते गेले आहेत. इहलोकाचा निरोप घेऊन परलोकात जाणारा माणूस कोणालाही आपला पत्ता कधीच देऊन जात नसतो. साऱ्यांना चुकवून तो जात असतो. अण्णांचा मृत्यू तसा अनपेक्षित नसला तरी आज मात्र त्यांच्या मृत्यूचा विचार करताना का कोण जाणे; मला वाटू लागले आहे, आज ना उद्या ही बातमी आपणाला ऐकावी लागणार, यासाठी माझ्या मनाची तयारी मी कितीही केली असली तरी जाता जाता अण्णानीही मला चकवलेच आहे. कारण जे काही सारं घडलंय ते तसं एकदम अनपेक्षित आहे.

डिसेंबरच्या सुरुवातीची गोष्ट असेल. 'माधुरी'चा डिस्को संगीताचा अंक बाजारात आला होता. आणि 'डिस्को संगीताची ही लाट किती दिवस टिकेल' याचा उहापोह करणाऱ्या त्या अंकात नौशाद, खय्याम, आर. डी. बर्मन, लक्ष्मीकांत-प्यारेलाल, बप्पी लाहिरी यासारख्या अनेक संगीतकारांच्या मुलाखती होत्या. पण अण्णांची मुलाखत मात्र त्या अंकात नव्हती. त्यांच्या मुलाखतीशिवाय डिस्को संगीताचा तो अंक निघावा ही मला त्या अंकातील सर्वात मोठी उणीव वाटत होती. कारण आज डिस्को संगीतापर्यंत येऊन पोचलेल्या भारतीय चित्रपट संगीताचा पाया खऱ्या अर्थाने अण्णानी संगीतबद्ध केलेल्या 'मिस्टर जॉन बाबा खान ऽऽ, संडे के संडे ऽऽ, गोरे गोरे ओ बांके छोरे ऽ ऽ, इना मिना डीका ऽ ऽ यासारख्या गाण्यानीच खऱ्या अर्थाने येथे घातला. आणि त्यांच्या या गाण्यापासूनच भारतीय चित्रपट संगीताला एक नवे वळण लागले. आजचे चित्रपट संगीत त्या वळणावरूनच पुढे चालले आहे. यमुळे आज आलेल्या 'डिस्को संगीताच्या लाटेबद्दल बोलायचा खरा अधिकार कोणाचा असेल तर तो फक्त अण्णांचा आहे. पण ही गोष्ट माधुरीवाल्यांच्या कशी लक्षात आली नाही कोण

# ओ ऽ! रूठके जानेवाले!

जाणे मला मात्र ही गोष्ट खटकली. आणि वाटू लागले अण्णांची मुलाखत नसल्यामुळे 'माधुरी'च्या अंकात जी उणीव राहिली आहे ती आपण पूर्ण करावी. डिस्को संगीताच्या आजच्या लाटेबद्दल त्यांना काय वाटते याविषयी 'चित्रानंद'साठी त्यांची आपण एक प्रदीर्घ मुलाखत घ्यावी. याला कारणही तसे सबळ होते. गेल्या वर्षी अण्णा फिल्म वर्ल्डच्या पारितोषिक समितीवर होते. या पारितोषिकात तेव्हा 'कुर्बानी'तील 'आप जैसा कोई मेरे जिंदगी में आये ऽ ऽ' या गाण्यासाठी सर्वश्रेष्ठ पार्श्वगायिका म्हणून नाजिया हसनच्या नांवाची एकमुखी शिफारस झाली होती. पण अण्णांनी मात्र या शिफारशीला जोरदार विरोध केला होता. अगदी हट्टाला पेटून नाजिया हसनऐवजी 'एक बार फिर'मधील एका गाण्यासाठी अनुराधा पौडवालला सर्वश्रेष्ठ पार्श्वगयिकेचे पारितोषिक द्यायला 'फिल्म वर्ल्ड'ला त्यानी भाग पाडले होते. नौशाद वा त्यांच्यासारख्याच एखाद्या संगीतकाराने हे केले असते तर मला त्याचे फारसे आश्चर्य वाटले नसते. पण अण्णानी हे करावे याचे मात्र मला राहून, राहून आश्चर्य वाटत होते. यामुळेच मला राहवले नाही. 'फिल्म वर्ल्ड'च्या पार्श्वगायिकेच्या पारितोषिकात अण्णांच्या आग्रहामुळे नाजिया हसनऐवजी अनुराधा पौडवालचे नांव पुढे आले आहे हे जेव्हा मला कळले तेव्हा त्याना मी विचारले, 'नाजिया हसनच्या नांवाला तुम्ही विरोध का करावा हे मला कळत नाही!'

'नाजिया हसनचे ते गाणे, काय गाणे आहे काय! नुसती बकवास आहे.'

'अण्णा हे तुम्ही बोलताय!'

'हो मीच बोलतोय.'

'पण आज जे गाणे तुम्हाला बकवास वाटते



त्या बकवासीला तुम्हीच येथे सुरुवात केली ना !'

'हो पण त्या वेळी मी केलेली ती एक चूक होती.' अण्णा तावातावाने बोलत होते.

या विषयावरील आमचे बोलणे तेव्हा तेथेच थांबले होते. पण 'माधुरी'चा डिस्को संगीताचा तो अंक पाहिल्यावर माझ्या डोक्यात पुन्हा चक्र फिरू लागली होती. आणि वाटू लागले होते. त्यावेळी अर्धवट राहिलेले अण्णांच्याबरोबरचे ते बोलणे आता पूर्ण करावे, 'गोरे गोरे ओबांके छोरे ऽऽ, इना मिना डीका ऽऽ'च्या काळात पाश्चिमात्य संगीताचे समर्थन करणारे अण्णा, डिस्को संगीताच्या आजच्या काळात पाश्चिमात्य संगीताचे एकदम विरोधक कसे काय बनले आहेत हे त्यांच्याकडून जाणून घ्यावे. त्यातून 'चित्रानंद'ला एक वेगळे फिचर मिळणार होते म्हणूनच अण्णाना मी मुद्दाम फोन केला. पण ते घरी नव्हते. पुण्याला गेले होते, यामुळे माझा फोन होता एवढा निरोप अण्णाना द्या. व पुण्याहून ते परतले की मला त्याना फोन करायला सांगा एवढा निरोप फोनवर मी त्यांच्या घरी दिला.

निरोप ठेवल्यावर अण्णांच्याकडून फोन आला नाही, असे कधीं व्हायचे नाही. यावेळीही ते पुण्याहून परततांच त्यांचा मला फोन आला. आणि मी फोनवर माझा विषय त्यांना सांगितला.

'आजच्या डिस्को संगीताच्या लाटेवरच तुम्हाला माझ्याशी बोलायचे आहे ना. मग या की, छानशी मैफल जमवून गप्पा मारत बसू या.'

'केव्हा येऊ!'

'केव्हाही फोन करून या. पण येत्या सत्तावीस डिसेम्बरपूर्वी या. त्यानंतर मी कोवाडला जाणार आहे.'

'कोवाडला कशासाठी!'

'नववर्षाचे स्वागत या वर्षी रणजित देसाईंच्या कंपनीत करायचा विचार आहे.' अण्णांनी आपला पुढील बेत मला सांगितला. आणि सत्तावीस तारखेपूर्वी अण्णाना भेटायचे असे ठरवून मी फोन खाली ठेवला. त्यावेळी अण्णांचा व माझा तो शेवटचा फोन ठरेल याची मला कल्पना नव्हती. पण दुर्दैवाने तोच अण्णांचा व माझा शेवटचा फोन ठरला. चोवीस डिसेंबरला संध्याकाळी जरा मोकळा वेळ होता यामुळे त्यांच्याकडे जाऊन त्यांची ती ठरलेली मुलाखत घ्यावी असा विचार करून त्यांचा फोननंबर मी फिरवला. तेव्हा ते आजारी असून त्यांना के. ई. एम्. मध्ये दाखल करण्यात आले असल्याची बातमी त्यांच्या घरुन कळली. त्यानंतर त्यांच्या वाढत्या आजाराची बातमीच एकसारखी कानी येत राहीली. आणि आता बातमी आली आहे ती त्यांच्या मृत्यूचीच.

कोवाडला जाऊन रणजित देसाईंच्याबरोबर नव्या वर्षाचे स्वागत करण्याचा अण्णांचा मनसुबा त्यांच्या आकस्मिक मृत्यूमुळे ज्याप्रमाणे हवेत विरून गेला आहे त्याच प्रमाणे त्यांच्या त्या मुलाखतीचा माझा मनसुबाही आता हवेत विरुन गेला आहे.

अलिकडच्या काळात काय झालं होतं कोण जाणे. अण्णांनी व मी मुलाखतीचे मनसुबे आखावेत आणि ते हवेत विरुन जावेत असंच एकसारखं चाललं होतं.

संगीतकार महंमद शफी यांचे निधन झाले त्यावेळीची गोष्ट. ओ. पी. नय्यर यांची त्यावेळी भेट झाली होती. आणि अण्णांची त्यांनी माझ्याकडे चौकशी केली होती. पण अण्णा त्यावेळी आफ्रिकेच्या दौऱ्यावर होते. ओ. पी.ना हे मी सांगितले तेव्हा त्यांनी मला विचारले, 'अण्णासाहेब हल्ली पुण्यालाच राहतात नाही का !'

'नाही. मुंबईतच राहतात. शनिवार व रविवार हे आठवड्यातील दोनच दिवस ते फक्त पुण्यात असतात.'

हे मला माहितच नव्हतं. गेल्या वीस वर्षात त्यांची भेट झालेली नाही. आफ्रिकेहून ते परतले की एकदा त्यांना भेटलं पाहिजे !



अण्णाना भेटायचा ओ. पीं.चा हा मनोदय ऐकून माझ्या व शिरीष कणेकरच्या डोक्यात एक वेगळीच कल्पना चमकून गेली. अण्णा व ओ. पी. हे दोघेही दुखावलेले सिंह असल्यामुळे त्यांना एकत्र आणून त्यांच्या गप्पा आपण ऐकत राहिलो तर त्यातून एक सनसनाटी फिचर आपल्या हाती लागले. त्या दृष्टीने आम्ही तयारीला लागलो, अण्णा आफ्रिकेहून परतताच आमच्या या फिचरची कल्पना मी त्यांच्या कानी घातली. त्यानाही ती आवडली.

●

**संगीतकारांची एक मैफल**
**नौशाद, रोशन, सी. रामचंद्र, अनिल विश्वास, गुलाम महंमद व मदन मोहन.**



ते मला म्हणाले 'ओ. पी.च्या व माझ्या गप्पा नक्कीच दिलखुलासपणे रंगतील आणि त्यातून एक चांगले फिचर तुमच्या हाती नक्कीच लागेल.'

अण्णांच्याकडून होकार मिळताच तात्काळ मी ओ. पीं.ना फोन केला. आणि त्यांच्या व अण्णांच्या भेटीतून आम्हाला जे फिचर आकाराला आणायचे होते त्याची कल्पना त्याला दिली, पण ती ऐकताच अण्णांना भेटायला उत्सुक असलेले ओ. पी. काहीसे गडबडल्यासारखे झाले.

ते मला म्हणाले, 'अण्णासाब एक महान संगीतकार आहेत. मी त्यांच्यासमोर कोणीच नाही. त्यांच्यासमोर तुम्ही मला बोलायला बसवलेत तर संगीतावर मला काहीच बोलता येणार नाही.'

'संगीत सोडून इतर बऱ्याच विषयावर तुम्हा दोघांच्या गप्पा रंगू शकतील की.'

'हो. पण त्यातून अनेक गैरसमज निर्माण होतील. आणि अण्णासाबप्रमाणे मला स्पष्टपणे बोलता येणार नाही.'

अण्णा ओ. पी. हे दोघेही दुखावलेले सिंह असल्यामुळे ते जर स्पष्टपणे बोलणार नसतील तर या फिचरला काहीच अर्थ उरणार नाही, असा विचार करून या फिचरची कल्पना मी तेथेच सोडून दिली. पण अण्णांच्या डोक्यातून ती गेली नव्हती. एके दिवशी त्यानीच या फिचरची मला आठवण करून देत विचारले, 'ओ. पी.ला व मला एकत्र आणून तुम्ही एक फिचर आकाराला आणणार होता, त्यांचे काय झाले !'

'ओ. पी. त्या फिचरला घाबरलेत !'

'का ! त्यात घाबरण्यासारखं काय आहे !'

'तुमच्याशी बोलताना आपल्या तोंडातून काही तरी कमी जास्ती गेलं तर त्यातून काही वाद निर्माण होतील अशी भीती त्याना वाटतेय.'

'भ्याड आहे लेकाचा' अण्णा एकदम चवताळले आणि मला म्हणाले, 'तुम्ही माझ्याबरोबर चला. आपण दोघे मिळून ओ. पी.च्या घरी जाऊ. मी गेल्यावर तो कसा काय बोलत नाही हे पाहतोच.'

पण याला काही अर्थ नव्हता. अण्णा व मी ओ. पीं.च्या घरी गेलो असतो तर एक प्रकारचे दडपणच ओ. पीं.च्या मनावर येण्याची शक्यता होती. आणि या दडपणाखाली ते मोकळेपणाने काहीच बोलले नसते. अण्णांच्या व त्यांच्या फिचरची कल्पना मी त्यांना ऐकवली तेव्हाच उडालेली त्यांची गडबड पाहून ही गोष्ट माझ्या लक्षात आली होती. यामुळे ओ. पीं.च्या घरी जाऊन बळजबरीने हे फिचर करण्यात मला काहीच अर्थ वाटला नाही. यामुळे अण्णाना तसे सांगून या फिचरची कल्पना मी तेथेच सोडून दिली.

यानंतर एका वेगळ्या फिचरची कल्पना डोक्यात आली. विजय नाफडेंच्या घरी अण्णांची जुनी गाणी ऐकत आम्ही एक मैफल जमवली होती. मैफलीला सूरही चांगला होता. आणि अण्णांच्या गाण्यावर जमलेला त्या मैफलीचा तो सूर पाहून वाटू लागलं होतं अण्णांच्याबरोबर एकदा नौशाद मिय्यानाही या मैफलीत घेऊन यावे. आणि त्या दोघांची जुनी गाणी ऐकत, त्या दोघाना त्या गाण्यावर येथे ते दोघे एकमेकांचे प्रतिस्पर्धी होते त्या काळावर त्याना बोलायला लावावं. यातून सुद्धा एखादं झकास 'फिचर' आकाराला येऊ शकेल.

अण्णांना या फिचरची कल्पना आवडली. आणि नौशादमिय्यानाही आवडली. नौशादमिय्या मला म्हणाले, 'अण्णा व मी एकत्र येऊन आमच्या काळावर बोलायला लागलो तर चित्रपट संगीताच्या एका इतिहासावर प्रकाश पडेल.'

पण त्या दोघांची ही मैफल जमवण्यातही एक अडचण होती, ती वेळेची. प्रकृती अस्वस्थामुळे नौशादमिय्या रात्री ही मैफल जमवून जागरण करू शकत नव्हते. आणि अण्णा 'आदतसे मजबूर' असल्यामुळे रात्र जागवल्याशिवाय मैफल रंगवूच शकत नव्हते. यामुळे त्या दोघांच्या सोयीची वेळ पाहून ही मैफल जमवावी, असे मी व विजय नाफडे ठरवित होतो पण या मैफलीचा योगही शेवटी नव्हता हेच खरं. कारण आज-उद्या जमवू करीत ही मैफल तशीच राहून गेली आणि आता ती कधीच जमणे शक्य नाही. कारण या मैफलीतील एक ताराच आता निखळून पडला आहे.

नौशादसाहेबांना फोन केला तेव्हा ते अमेरिकेत असल्याचे कळले. पण येथे असते तर ते नक्कीच म्हणाले असते, 'अपना रामचंद्र चला गया, बहोत बुरा हुआ. वो एक ताकदवाला संगीतकार था. लेकिन...!'

नौशादमिय्यानी पुढं काही बोलण्यापूर्वीच त्यांना काय म्हणायचंय हे माझ्या लक्षात आलं असतं. अण्णांच्या पिण्याच्या संवयीबद्दलच ते बोलले असते. जयकिशन व मदनमोहन गेले

तेव्हादेखील नौशादमियानी त्या दोघांच्या पिण्याबद्दल हळहळ व्यक्त केली होती. मदनमोहनच्या मृत्युनंतर त्याला आदरांजलि वाहण्यासाठी भरलेल्या दुःखवस्थाच्या सभेत तर नौशादमिय्या सरळ म्हणाले होते, 'पिणे हा आमच्या संगीतकलेला लागलेला एक अभिशापच आहे. आणि या अभिशापानेच जयकिशन व त्यानंतर आता मदनमोहन या दोन थोर संगीतकारांचा बळी घेतला आहे. इतरांनी यातून काही धडा घेण्यासारखा आहे.'

अण्णाही त्या दुःखवस्थाच्या सभेला हजर होते. यामुळे नौशाद मिय्यांच्या बोलण्याचा रोख उघडपणे त्यांनाच उद्देशून होता. पण याचा अण्णांच्यावर कधीच काही परिणाम होणे शक्य नव्हते. ते नेहमी म्हणायचे, 'माणूस दारूनं मरतो, हे झूट आहे. तो आपल्या मरणानेच मरत असतो.'

वसंत देसाई गेले तेव्हांची गोष्ट. त्यांच्या मृत्यूबद्दल हळहळ व्यक्त करताना अण्णा तेव्हा मला म्हणाले होते, 'वसंतरावांच्या दुःखवस्थाच्या सभेत बोलण्याची पाळी माझ्यावर येईल असे मला कधी वाटले नव्हते. एकदा मी, मदनमोहन व वसंतराव कलकत्याला एका संगीत कार्यक्रमाला परीक्षक म्हणून गेलो होतो. माझं व मदनचे पिंणे वसंतरावाना आवडत नव्हते. यामुळे कलकत्त्याला ज्या हॉटेलमध्ये आमची राहण्याची व्यवस्था करण्यात आली होती, त्या हॉटेलमध्ये माझ्या व मदनच्या खोलीत राहायला ते तयार झाले नाहीत. स्वतःसाठी त्यानी वेगळी खोली घेतली. पण मी व मदन कमी नव्हतो. वसंतरावाना आमचे पिणे आवडत नाही हे पाहून त्याना चिडवण्यासाठी त्यांच्या खोलीत जाऊन आम्ही मुद्दाम पीत बसायचो. त्यांना ही गोष्ट आवडायची नाही. यामुळे पिणे किती वाईट आहे यावर आम्हाला ते लंबेचवडे व्याख्यान द्यायचे. पण त्यांच्या त्या व्याख्यानांचा आमच्यावर काही परिणाम व्हायचा नाही. आम्ही दोघे गमतीने त्यांना म्हणायचो, 'न पिऊन आम्हाला काही तुमच्याइतकं जगायचं नाही. आमच्यानंतर आमच्या दुःखवस्थाच्या सभेत तुम्हालाच आमच्यावर व्याख्यान द्यावे लागणार आहे. तुमच्यानंतर तुमच्या दुःखवस्थाच्या सभेत व्याख्यान देण्याचा प्रसंग आमच्यावर यावा, इतके आयुष्य परमेश्वराने आम्हाला द्यायचे ठरवले तरी ते आम्हाला नको आहे.'

मदन मोहनला दुर्दैवाने तेवढे आयुष्य लाभले नाही. पण अण्णांच्यावर मात्र वसंतरावांच्या निधनानंतर त्याना आदरांजलि वाहण्यासाठी भरलेल्या सभेत बोलण्याचा प्रसंग आला. वसंतरावांचा तो मृत्यू अतर्क्य होता, यामुळेच अण्णा त्या मृत्यूने काहीसे विचलित झाल्यासारखे झाले होते. मनाच्या त्या विचलित अवस्थेतच तेव्हा ते मला म्हणाले, 'आम्ही इतकी दारू पितो तरी आम्हाला काही होत नाही. आणि दारूच्या थेंबालाही स्पर्श न करणाऱ्या आमच्या वसंतरावाना हा असा मृत्यू यावा म्हणजे काही कळतच नाही.'


दो 'अलबेला'मध्ये
भगवान व सी. रामचंद्र

महमद रफी गेले तेव्हादेखील अण्णा हेच म्हणत होते.

श्रीकांत ठाकरेंबरोबर अण्णा महमद रफीच्या अंत्यदर्शनाला गेले होते. तेव्हादेखील त्यांच्या हातात मद्याचा ग्लास होताच आणि तो ग्लास हातात धरूनच एकसारखे ते पुटपुटत होते, 'सिगारेट-दारूचे व्यसन न करणाऱ्या रफीला परमेश्वराने एवढ्या लौकर आमच्यातून नेले आणि आम्ही पीत असूनही साठीनंतरचे आयुष्य आम्हाला दिले. काय म्हणावे या कर्माला! या मृत्यूचं काही कळत नाही.'

खरंच कोणाला कळत नाही.

अण्णांना तरी ते कोठे कळत होते. रणजित देसाईंच्या संगतीत नव्या वर्षाचं स्वागत करायला कोवाडला जायची तयारी त्यांनी चालवली होती. पण...!

काळासमोर कोणाचा काही इलाज नसतो हेच शेवटी खरं. अण्णांच्या बरोबरच्या त्या मुलाखतीची माझी कल्पना यामुळेच आज हवेत विरून गेली आहे. पण अण्णांच्या आठवणी मात्र कधीच हवेत विरून जाणार नाहीत. त्या सदैव माझ्याबरोबर राहाणार आहेत. आणि आज तर त्या प्रकर्षाने माझ्या डोक्यात एकसारख्या फेर धरू लागल्या आहेत.

एक आठवण 'शहनाई'मधील त्यांच्या 'आना मेरी जान संडे की संडे ऽऽ' या गाण्याची. या गाण्यानेच हिंदी चित्रपट संगीताला पाश्चिमात्य संगीताचे वळण लावले. हे गाणे संतोषींनी मुळात 'शहनाई' या चित्रपटासाठी लिहिलेले नव्हते. अभिनेत्री नस्सीम व तिचे पतीराज एम्. एहसान यांच्या 'चांदनी रात' या चित्रपटासाठी हे गाणे त्यांनी लिहिले होते. नौशाद त्या चित्रपटाचे संगीतकार होते. आणि एस. मुकर्जी त्या चित्रपटाच्या निर्मितीचे एक मार्गदर्शक. 'संडे की संडे ऽऽ' या गाण्याचा कागद संतोषींनी जेव्हा त्यांच्या हातात दिला तेव्हा त्यांचे माथे एकदम भडकले होते. आणि शेंडा-बुडका नसलेले हे अधेड गाणे चित्रपटात कधीच चालू शकणार नाही, असा अभिप्राय व्यक्त करून ते त्यांनी सरळ फेकून दिले होते. तेव्हापासून ते गाणे संतोषींच्याजवळ तसेच पडून होते. आणि 'शहनाई' या चित्रपटात त्याचा समावेश होणेही तसे शक्य नव्हते. कारण 'चांदनी

रात'च्यावेळी या गाण्याला विरोध करणारे एस्. मुकर्जीच 'शहनाई' ज्या फिल्मिस्तानतर्फे निर्माण होत होता त्या फिल्मिस्तानचे एक संस्थापक होते. तरीही त्यानीच विरोध केलेले हे गाणे त्यांची नजर चुकवून 'शहनाई'त गेले. एस्. मुकर्जी तेव्हा आजारी पडले होते. आणि त्यांच्या गैरहजेरीत कंपनीतील सारे काम एकदम थंडावले होते. हे पाहून काहीच काम होत नसेल तर 'शहनाई'तील एखाद्या गाण्याचे तरी रेकॉर्डींग करून टाका, असा तगादा फिल्मिस्तानचे दुसरे संस्थापक रायबहादूर चुनीलाल (कै. मदनमोहन यांचे वडील) यानी संतोषीं व अण्णा यांच्या मागे लावला होता. संतोषींच्याजवळ तेव्हा नवे गाणे लिहून तयार नव्हते. त्यामुळे पडून असलेल्या 'चांदनी रात'साठी लिहिलेल्या त्या गाण्याचा कागद त्यानी अण्णांना दाखवला. व एस. मुकर्जींचा त्या गाण्याला असलेला विरोधही त्याना सांगून त्यांच्या गैरहजेरीत हे गाणे आपण ध्वनीमुद्रित केले तर काय होईल याची कल्पनाही त्यानी अण्णाना दिली. पण 'अचेड' म्हणून एस. मुकर्जींनी जे गाणे फेकून दिले होते ते त्याच्या अचेडपणामुळेच अण्णाना आवडले. आणि एस. मुकर्जी आजारपणामुळे स्टुडिओत येऊ शकत नाहीत हे पाहून त्यांच्या गैरहजेरीतच ते गाणे ध्वनीमुद्रित करून टाकण्याचे त्यांनी ठरवले.

गाणे ध्वनीमुद्रित झाले. ध्वनीमुद्रित झाल्याबरोबर ते रायबहाद्दूर चुनीलाल, फिल्मीस्तानचा आणखी एक संस्थापक अशोककुमार व कंपनीतील इतर मंडळीना ऐकवण्यात आले. आणि सर्वानाच ते गाणे आवडले. चित्रपट संगीतातील हा एक नवाच प्रकार आहे, असा एकमुखी अभिप्राय सर्वांनी व्यक्त केला. स्टुडिओतील सर्व मंडळींना ते गाणे इतके आवडले की, त्याचे चित्रीकरण होण्यापूर्वीच ते स्टुडिओत एकसारखे वाजवले जाऊ लागले. आणि स्टुडिओतील लहान–थोर मंडळीपासून ते कॅन्टीनमधील मुलांच्याही तोंडी ते बसले. एस. मुकर्जी आजारातून उठून स्टुडिओत आले तेव्हा सर्वांच्याच तोंडात ते गाणे बसले होते. यामुळे त्या गाण्याला असलेला त्यांचा विरोध मावळला. आणि 'शहनाई' पडद्यावर आल्यावर त्या गाण्याने लोकप्रियतेचा एक एका इतिहास घडवला.

मी 'साई सावली'वर पोचलोय. अण्णांच्या अंत्यदर्शनाला मंडळी जमू लागलीत. त्या मंडळीत मला गजानन जागिरदार दिसले. आणि त्याना पाहताच 'संडे की संडे ऽऽ' या गाण्याच्या लोकप्रियतेची एक आठवण मला आठवली. सी. रामचंद्र मिनर्व्हात संगीत-दिग्दर्शक मीरसाहेब यांच्याकडे पेटी मास्तर म्हणून काम करीत होते. तेव्हा राम चितळकर या नांवाने ओळखले जात होते. गजानन जागिरदारही तेव्हा तेथे होते. यामुळे तेव्हापासूनची त्या दोघांची ओळख. 'शहनाई'च्या लोकप्रियतेनंतर बऱ्याच वर्षांनी एकदा सी. रामचंद्र व गजानन जागिरदार यांची भेट झाली.

'काय चितळकर हल्ली काय करताय?'
जागिरदारानी त्याना विचारले.

'म्युझिक देतोय.'

'द्या द्या! आपल्या मराठी लोकांनी काहीतरी केलं पाहिजे. तो मद्रासचा कोण सी. रामचंद्र आलाय पाहा. सर्वत्र त्याने काय घुमाकूळ घातलाय. आपल्या मराठी मंडळींनीही असेच यश मिळवले पाहिजे.'

हे ऐकल्यावर अण्णांना हसावे की रडावे हे कळेचना. कारण संगीत-दिग्दर्शक बनल्यानंतर सी. रामचंद्र हे नांव त्यांनी धारण केलेले असल्यामुळे राम चितळकर या नांवाने त्यांना ओळखणाऱ्या मराठी मंडळींना काही केल्या त्यांची ओळख पटत नव्हती. सी. रामचंद्र या नांवामुळे हा कोणीतरी मद्रासी माणूसच आहे असे त्याना वाटत होते.

सी. रामचंद्र हे नांव धारण करणारे आमचे अण्णा जन्माने मराठी असले तरी एक संगीतकार म्हणून मद्रासलाच एका तामिळी चित्रपटाद्वारे त्यांच्या कारकीर्दीला सुरुवात झाली. मा. भगवान त्या चित्रपटाचे दिग्दर्शक होते. त्यांचाच हात धरून 'सुखी जीवन'द्वारा त्यांनी हिंदीत प्रवेश केला. आणि 'सुखी जीवन'पासून ते १९६४–६५ च्या 'बहूरानी'पर्यंत प्रत्येक चित्रपटागणिक अण्णांच्या यशाची कमान येथे सातत्याने वाढतच राहीली. आणि यशाच्या त्या चढत्या कमानीवरून खाली आल्यावरही यशाच्या काळातील या माणसाचा तो तोरा काही कमी झाला नाही. आपले सारे आयुष्य हा माणूस आपल्या मस्तीत जगला.

अंत्यदर्शनाला जमलेल्या मंडळीच्या गर्दीत माझ्याशेजारीच रेकॉर्डीस्ट बी. एन्. शर्मा उभे होते. माझ्याशी बोलताना अण्णांच्या या मस्तीवरच ते बोलत होते. ते मला म्हणाले, 'अण्णा, हा खऱ्या अर्थाने एक ताठ मानेचा माणूस होता. आपल्या आयुष्यात तो कोणासमोर कधी झुकला नाही.'

कोणासमोर कधी न झुकणाऱ्या अण्णांनी

एखाद्याशी त्यांची मैत्री जमली की त्या मैत्रीतही कधी अंतराय निर्माण होऊ दिला नाही. बी. एन. शर्मा हे त्यांचे एक जीवाभावाचे मित्र. यामुळे आपल्या प्रत्येक गाण्याचे रेकॉर्डिंग त्यांच्याकडेच झाले पाहिजे यावर त्यांचा कटाक्ष असायचा. मध्यंतरी काहीतरी कारणावरून लता मंगेशकर व बी. एन्. शर्मा यांचे बिनसले. आणि शर्माजींच्याकडे गायचे नाही, असा निर्णय त्यांनी घेतला. अण्णांच्याकडे लताबाईंच्या एका गाण्याचे रेकॉर्डिंग नेमके त्याचवेळी निघाले. पण लताबाई काही केल्या शर्माजींच्याकडे गायला तयार होईनात. त्यांनी अण्णांना सांगितले, 'माझा आवाज तुम्हाला हवा असेल तर शर्मा सोडून अन्य कोणाही रेकॉर्डिस्टकडे माझ्या गाण्याचे ध्वनीमुद्रिण तुम्ही करा. शर्माकडे मी जाणार नाही.'

अण्णांच्या जागी दुसरा कोणी संगीतकार असता तर लताबाईंची खप्पा मर्जी नको म्हणून इतर कोणत्याही रेकॉर्डीस्टकडे आपल्या गाण्याचे रेकॉर्डींग करायला तो तयार झाला असता. पण लताबाई कितीही मोठ्या असल्यातरी त्यांच्या मोठेपणाखाली दबून अण्णांनी शर्माजींच्या मैत्रीकडे पाठ फिरवली नाही. लताबाईंना त्यांनी चोख सांगितले, 'माझे गाणे मी शर्माकडेच रेकॉर्ड करणार. तुला गायचे असेल तर गा. नाही तर मी अन्य कोणाकडून हे गाणे गाऊन घेईन.'

त्यानंतर लताबाईंच्याऐवजी खरंच दुसऱ्या गायिकेकडून ते गाणे त्यांनी गाऊन घेतले होते.

अण्णा नामक या माणसाची जिद्द ही अशी होती.

प्रसाद प्रॉडक्शनच्या 'शारदा' या चित्रपटाच्या वेळची गोष्ट, राज कपूर त्या चित्रपटाचा नायक होता. त्याची भूमिका असलेल्या कोणत्याही चित्रपटातील गाणी संगीतकाराने त्याला प्रथम ऐकवून त्याच्या पसंतीचा शिक्कामोर्तब त्यावर घेतला पाहिजे असा एक अलिखित नियमच तेव्हा बनून गेला होता. पण 'शारदा'च्यावेळी अण्णांनी काही हा अलिखित नियम जुमानला नाही. राज कपूरला त्यांनी स्पष्ट सांगितले, 'तुम्ही या चित्रपटाचे फक्त नायक आहात. निर्माते नव्हे. मी माझी गाणी ऐकवायची असतील तर ती फक्त निर्मात्याला ऐकवतो. नायकाला नाही.'

'अण्णा, तुम्ही ऐऱ्यागैऱ्या नायकाशी नाही तर राज कपूरशी बोलत आहात.'

'असेन पण मला त्याचे महत्व नाही. तुम्ही कितीही मोठे नायक असला तरी निर्मात्याशिवाय अन्य कोणालाही गाणी न ऐकवण्याची माझी परंपरा मी कधीच सोडणार नाही.'

मंगेशकर व कपूर मंडळीशी भांडण ओढवून घेणे हा त्याकाळात विस्तवाशी खेळण्याचाच एक प्रकार होता. पण अण्णांनी आयुष्यात त्याची कधीच पर्वा केली नाही. विस्तवाशी खेळ खेळून आपले यश त्यात त्यांनी पोळून टाकले. पण ते पोळून टाकल्यानंतरही त्यांच्या स्वभावातील मस्ती कधी कमी झाली नाही. आपल्या त्या मस्तीतच शेवटपर्यंत ते ताठपणे जगले.

## सी. रामचंद्र व लता

संगीतकार ओ. पी. नय्यर हे संगीतकार सी. रामचन्द्र यांना श्रद्धांजली वाहताना म्हणाले—

'सी. रामचन्द्र इतक्या तोलामोलाचा संगीतकार आजवर भारतात झाला असे मला वाटत नाही लताबाईंनी विविध संगीतकारांकडे गाणी गायिली. पण विविध ढंगाची गाणी फक्त सी. रामचंद्र यांनीच लताबाईंकडून गाऊन घेतली.

१९७५ च्या सुमारची गोष्ट.

एका जमान्यात आपल्या संगीताने अजरामर बनलेला अण्णांचा 'अलबेला' हा चित्रपट तेव्हा नव्याने पुन्हा पडद्यावर आला होता. अण्णा तेव्हा तसे इतिहासजमा झालेले एक संगीतकार बनले होते. पण अण्णा एक इतिहासजमा संगीतकार बनले असले तरी 'अलबेला'तील त्यांचे संगीत काही इतिहासजमा झालेले नव्हते. नव्या पिढीतील प्रेक्षकानाही त्या संगीताने झपाटून टाकले होते. आणि अनेक तरुण तर त्या संगीताच्या तालावर नाचू लागले होते. पंचवीस, तीस वर्षापूर्वीच्या 'अलबेला'तील जुन्या संगीताला १९७५ साली नव्या चित्रपटातील संगीतालाही लाजवील अशी ही अभूतपूर्व लोकप्रियता मिळावी याचेच अनेकांना तेव्हा कौतुक वाटत होते.

भगवानदादांची तेव्हा एकदा भेट झाली. आणि इतक्या वर्षानंतर नव्या चित्रपटातील संगीताला लाजवणाऱ्या 'अलबेला'च्या संगीताच्या लोकप्रियतेचा विषय मी त्यांच्याजवळ काढला. याबरोबर पंचवीस, तीस वर्षापूर्वी अण्णांनी चित्रपट संगीतात जे करून ठेवले आहे त्यावरच आजचे संगीतकार कसे जगत आहेत या विषयावर ते माझ्याशी बोलू लागले.

भगवानदादांचे हे मत ऐकून मला राहवले

सूर व आवाज ●



नाही. मी त्यांना विचारले, 'अण्णा आजही हे करू शकणार नाहीत का!'

'सहज करू शकेल. पण...!' भगवानदादा काहीसे अडखळले.

'पण काय!'

'लताबाईंशी त्याने समझोता केला पाहिजे. पण हे त्याला समजावून सांगायचे कोणी! तू सांगतोस का! माझी खात्री आहे लताबाईंशी त्याने समझोता केला तर आजच्या अनेक संगीतकारांची तो पार सुट्टी करून टाकील.'

माझ्यासारख्या अण्णांच्या अनेक हितचिंतकानाही मनापासून हेच वाटत होते. कारण भांडणातून नुसते भांडण वाढत असते. पण त्यातून कोणाचेही काही हीत होत नसते. शंकर, एस. डी. बर्मन यांच्यासारखे श्रेष्ठ संगीतकारही ही गोष्ट ओळखून होते. यामुळे मध्यंतरी काही काळ लताबाईंशी झालेले त्यांचे मतभेद विसरून त्यांनी त्यांच्याशी समझोता केला. शंकर व बर्मनदादा यासारखे मोठे संगीतकार जर हे करू शकतात तर ते आमच्या अण्णांनी का करू नये! त्यांच्याबाबतीत अनेकदा आम्हाला हा प्रश्न पडायचा. यामुळेच 'अलबेला'च्या जुन्या संगीताला १९७५ साली मिळालेल्या अभूतपूर्व लोकप्रियतेनंतर मला राहवले नाही. अशीच एकदा त्यांची भेट झाली असता भगवानदादांना त्यांच्याविषयी काय वाटते हे सांगून त्यांना मी म्हणालो, 'अण्णा, तुम्ही लताबाईंशी समझोता केलात तर किती बरे होईल.'

'मी लताबाईंशी समझोता करू! या जन्मी ते कदापि शक्य नाही.'

'का! शंकर व बर्मनदादा जर लताबाईंशी समझोता करू शकतात तर तुम्हाला लताबाईंशी समझोता करायला काय हरकत आहे!'

'मी जाऊन तिच्याशी समझोता करायला तिने मला घडवलेले नाही. मी तिला घडवले आहे.'

लताबाईंना आपण घडवले हा अण्णांचा एक इगो होता. त्यांच्या संगीतातून लताचा आवाज उणे केला तर त्यांच्या संगीतात उरले काय? असा प्रश्न कोणी उपस्थित केला तर अनेकदा त्यांचा हा 'इगो' एकदम डिवचला जायचा. उसळून ते बोलायला लागायचे, 'लताचा आवाज उणे केला तर माझ्या संगीतात काय उरले असे माझ्याबाबतीत कोणी म्हणायला मी लताचा हात धरून येथे उदयाला आलेलो नाही.

ती येथे कोणी नव्हती तेव्हापासून मी येथे आहे. आणि लता युगाचा येथे उदय होण्यापूर्वी 'सफर, शहनाई, खिडकी, साजन, यासारख्या अनेक चित्रपटात अमीरबाई, शमशाद, ललिता देऊळकर, बिनापानी मुकर्जी, मीना कपूर यासारख्या गायिकांच्या आवाजातील गाणी 'हीट' करून दाखवून माझे स्थान मी केव्हाच प्रस्थापित केले आहे. लता तेव्हा येथे कोठे होती! 'शहनाई'तील 'जवानी की रेल चली जाये रे ऽऽ' या गाण्यातील दोन ओळीसाठी सर्वात मी तिचा आवाज प्रथम वापरला, तेव्हा एस. मुकर्जींनी त्या दोन ओळीसाठीही लताचा आवाज घ्यायला विरोध केला होता. अमीरबाई, शमशाद यासारख्या खड्या आवाजातील गायिकांच्या काळात हा इतका पातळ आवाज चित्रपट संगीतक्षेत्रात अजिबात चालणार नाही, असे त्याना वाटत होते. पण म्हणून काही एस. मुकर्जींच्या त्या विरोधासमोर मी नमलो नाही. कोणासमोर नमणे हे माझ्या स्वभावात नाही. यामुळे हट्टाने त्या ओळीसाठी तिचा आवाज मी घेतला. आणि येथे तिला घडवले.'

अण्णांचा हा 'इगो' तसा खोटा नव्हता. नूरजहाँ ही त्या काळातील एक श्रेष्ठ गायिका होती. आज लताबाईंच्या गाण्यांचा प्रभाव ज्याप्रमाणे प्रत्येक नव्या गायिकेवर पडतो त्याचप्रमाणे नूरजहाँच्या गाण्याचा प्रभाव तेव्हा येथे प्रत्येक नव्या गायिकेवर पडत होता. आणि सुरुवातीच्या काळात लताबाईही याला अपवाद नव्हत्या. नूरजहाँच्या ढंगानेच आपली गाणी त्या गात होत्या. आणि गुलाम हैदर, श्यामसुंदर हे लताबाईंचे सुरुवातीचे संगीतकार, नूरजहाँचे संगीतकार असल्यामुळे त्यांच्या संगीतावरही नूरजहाँच्या आवाजाचा एवढा प्रभाव होता की नूरजहाँच्या आवाजातच ते लताबाईंना गायला लावत होते. नूरजहाँच्या आवाजाच्या प्रभावातून लताबाईंना येथे खऱ्या अर्थाने कोणी बाहेर काढले असेल तर ते फक्त दोन संगीतकारांनी एक अण्णा आणि दुसरे हुस्नलाल-भगतराम.

अनेकदा अण्णा यावर बोलायचे– 'लताच्या आवाजावर असलेला नूरजहाँचा ठसा पुसून काढण्यासाठी एक वेगळी लता निर्माण करण्यासाठी त्याकाळात आम्ही किती मेहनत घेतली.'

आज लताबाई यावर काहीच बोलत नसल्या तरी त्या काळातील अनेक कलावंत बोलतात, सुरैय्या तर स्पष्टपणे सांगते– 'हुस्नलाल भगतराम व सी. रामचंद्र या दोन संगीतकारांनी लतावर जी मेहनत घेतली त्यातूनच आजची लता निर्माण झाली आहे.'

कोणत्याही गायक-गायिकांच्या आवाजावर अशी मेहनत अण्णा घेऊ शकत होते. याचे कारण ते केवळ एक संगीतकारच नव्हते तर एक संगीत-शिक्षकही होते.

आज येथे अनेक संगीतकार असले तरी गायक–गायिकेवर मेहनत घेऊन त्यांचे भवितव्य येथे घडवू शकतील असे संगीत शिक्षक कोठे उरले आहेत!



आजच्या अनेक गायक-गायिकांची हीच तर सर्वात मोठी व्यथा आहे. सुलक्षणा पंडीतने एकदा ही व्यथा उघडपणे बोलून दाखवली होती. आणि लताबाईंच्या काळात ज्याना आपण खऱ्या अर्थाने गॉडफादर म्हणू शकू असे खेमचंद प्रकाश, अनिल विश्वास, सी. रामचंद्र, हुस्नलाल-भगतराम यासारखे संगीतकार जसे येथे होते तसे संगीतकारच आमच्या पिढीला दुर्दैवाने येथे लाभलेले नाहीत अशी जाहीर तक्रार केली होती.

तर ते जाऊ द्या. आपण मूळ मुद्यावर येऊ या. अण्णा व लताबाईंचा समझोता.

काही केल्या या मुद्यावर अण्णा कधी झुकायला तयार नव्हते. यामुळे या समझोत्याचा विषय मी त्यांच्याजवळ काढला तेव्हा ते मला म्हणाले, 'लताला माझी ताकद माहित आहे आणि ती ओळखून वेळ येईल तेव्हा तिने आपणहून माझ्याशी समझोता केला आहे. शांतारामबापूंच्या 'नवरंग' या चित्रपटाच्या संगीत-नियोजनाची जबाबदारी मी जेव्हा स्वीकारली तेव्हा लता माझ्याकडे गात नव्हती; पण म्हणून काही तिचे पाय धरायला मी गेलो नाही. उलट तिच्या आवाजाशिवाय या चित्रपटाचे संगीत मी 'हीट' करून दाखवीन अशी जिद्द मी बांधली आणि आशाचा आवाज घेऊन त्या चित्रपटाचे संगीत मी 'हीट' करून दाखवले. त्यानंतर 'स्त्री' हा शांतारामबापूंचा त्यानंतरचा चित्रपट माझ्याकडे जेव्हा आला तेव्हा लताने स्वतः शांतारामबापूंना फोन करून त्या चित्रपटात माझ्या संगीताखाली गाण्याची इच्छा व्यक्त केली. तिच्याविषयी माझ्या मनात

## 'ए मेरे वतन के लोगो...!'
## कवि प्रदीप व सी. रामचंद्र

●

कोणत्याही प्रकारची आकस असती तर काही केल्या लताचा आवाज घ्यायचा नाही म्हणून मी अडून बसू शकलो असतो. तेवढी ताकद तेव्हा माझ्यात होती. शांतारामबापूंच्या 'परछाई' या चित्रपटाच्या संगीत-नियोजनाची जबाबदारी मी जेव्हा स्वीकारली त्यावेळची एक हकीकत तुम्हाला सांगतो. जयश्रीबाई त्या चित्रपटाच्या नायिका होत्या. आणि तोवर शांतारामबापूंच्या प्रत्येक चित्रपटात आपली गाणी त्या स्वतःच गात होत्या. पण तेव्हा जयश्रीबाईंची गाणी मलाच गायला मिळाली पाहिजेत असा हट्ट लताने माझ्याजवळ धरला आणि 'परछाई'साठी माझे संगीत तुम्हाला हवे असेल तर जयश्रीबाईंच्यासाठी लताचा आवाज तुम्हाला घ्यावा लागेल अशी अट मी शांतारामबापूंना घातली. आणि त्यानीही ती बिनशर्त मान्य केली. मग 'स्त्री'च्या वेळी लताचा आवाज मला नको अशी अट मी त्याना घातली असती तर ती त्यानी मान्य केली नसती का ? पण लताने माझ्या मार्गात कितीही अडथळे आणण्याचे प्रयत्न केले तर मी मात्र तिच्या मार्गात अडथळे आणण्याचा प्रयत्न कधी केला नाही. आपणहून तिच्याकडे न जाता ती स्वतःहून माझ्याकडे गायला आली तर नेहमीच मी तिला गाण्याची संधी दिली. 'स्त्री'त तिचा आवाज मी घेतला. आणि त्यानंतर तिला मला व कवि प्रदीपना अजरामर बनवणाऱ्या 'ए मेरे वतनके लोगो ऽ ऽ गाण्यातही.'

'ए मेरे वतन के लोगों ऽ ऽ' या गाण्याची लोकप्रियता हा अण्णांच्या आयुष्यातील एक सर्वोच्च आनंदाचा क्षण होता. एका बाजूला कपूर मंडळींशी घेतलेले भांडण आणि दुसऱ्या बाजूला लताबाईंशी झालेले मतभेद यामुळे तेव्हा ते चित्रपटव्यवसायातून फेकल्यासारखे झाले होते. आणि चीनी आक्रमणानंतर डिफेन्स फंडासाठी चित्रपट कलावंतांचा कार्यक्रम सादर करायचे ठरले तेव्हा अण्णांच्याजवळ एकाही नव्या चित्रपटातील गाणे त्या कार्यक्रमासाठी नव्हते. पण या कार्यक्रमात काही वेगळेपण द्यायचे असेल तर फक्त अण्णाच देऊ शकतील याची खात्री दिलीपकुमारला वाटत होती. यामुळे तो मुद्दाम अण्णांच्याकडे आला. आणि या कार्यक्रमात त्यांनी भाग घेतलाच पाहिजे असा आग्रह त्याने त्यांना केला. अण्णानीही मोठ्या जिद्दीने या कार्यक्रमात उतरायचे ठरवले. आणि कवि प्रदीपना बोलावून या कार्यक्रमासाठी 'ए मेरे वतन के लोगो ऽ ऽ' हे गाणे त्यांच्याकडून खास लिहून घेतले. लताबाई तेव्हा त्यांच्याकडे गात नव्हत्या. यामुळे आशाबाईंच्याकडून हे गाणे गाऊन घ्यायचे त्यांनी ठरवले होते. आणि त्यांच्या आवाजातच या गाण्याची रिहर्सल त्यांनी सुरू केली होती. पण नेहरूंच्यासमोर हे गाणे गायिले जाणार आहे हे कळल्याबरोबर लताबाईंनी या गाण्याचे महत्व ओळखले. आणि आशाबाईंच्यावर त्यांनी काय दडपण आणले कोण जाणे, अण्णांना येऊन त्यांनी सांगितले, 'माझ्या आवाजात या गाण्याची रिहर्सल तुम्ही सुरू केली असली तरी दिदी हे गाणे मला गाऊ देईल, असे मला वाटत नाही. कारण हे गाणे स्वतःच गाण्याची तिची इच्छा आहे.'

आणि प्रत्यक्षात झालेही तसेच. आशाबाईंच्या आवाजात या गाण्याची रिहर्सल झाली असली तरी प्रत्यक्ष कार्यक्रमाच्या वेळी आजारपणामुळे आपण येऊ शकत नाही, असे त्यांनी कळवले. आणि त्यांच्याऐवजी लताबाई हे गाणे गायला आल्या. अण्णांशी त्यांचे कितीही मतभेद असले तरी ते विसरून त्या आल्या आणि 'ए मेरे वतन के लोगों ऽ ऽ' या गाण्याने लोकप्रियतेचा एक नवा इतिहास घडवला. पण या गाण्याच्या लोकप्रियतेचे हे यश मात्र अण्णा व प्रदीप यांचेपासून स्वतःकडेच हिसकावून घेण्याचा प्रयत्न त्यानंतर लताबाईंनी पद्धतशीर केला. त्यानंतरच्या काळात 'ए मेरे वतन के लोगों ऽ ऽ'च्या

लोकप्रियतेच्या ज्या काही बातम्या यायच्या त्या बातम्यात लताबाईनाच अग्रक्रम दिला जायचा. आणि कवि प्रदीप व अण्णा यांचे नांव त्या यशात घेतले जायचेच नाही. अधुनमधून कवि प्रदीप यांचे नांव कधीतरी घेतले तरी जायचे. पण अण्णांचे नांव मात्र या यशात एकदम तांदळातील खड्याप्रमाणे बाजूला काढले जायचे.

एका कार्यक्रमात लताबाई हे गाणे गात होत्या. दिलीपकुमार त्या कार्यक्रमाचा निवेदक होता. लताबाईंच्या आवाजामुळे या गाण्याने नेहरूंच्या डोळ्यातही कसे अश्रू उभे केले यावर त्या कार्यक्रमाचे निवेदन करताना तो बरेच काही बोलला. या गाण्याचे कवि म्हणून प्रदीप यांचे नांवही त्या कार्यक्रमात स्पीकरवर त्याने सांगितले. पण अण्णा त्या कार्यक्रमाला हजर असूनही संगीतकार म्हणून त्यांचे नांव सांगण्याचे भान काही त्याला राहीले नाही अण्णा त्यावेळी केवढे उसळले होते. दिलीपकुमारला सरळ म्हणाले होते, 'तू देखील चित्रपटव्यवसायातील आपले स्थान टिकवण्यासाठी सध्या चमचेगिरी करायला लागलायस् हे मला माहीत नाही.'

'ए मेरे वतन के लोगो ऽऽ' या गाण्याला एवढी उत्तुंग लोकप्रियता मिळूनही त्या गाण्याच्या यशाचे श्रेय त्यांच्यापासून हिराबून घेण्याचा येथे जो पद्धतशीर प्रयत्न झाला त्यावर अण्णा एकदम कडवटपणे बोलायचे, म्हणायचे-'ए मेरे वतन के लोगो ऽऽ' या गाण्याच्या यशाचे खरे मानकरी आम्ही तिघे. मी, कवि प्रदीप व लता. मग लताच्या आवाजामुळेच हे गाणे एवढे लोकप्रिय झाले असा प्रचार का! केवळ लताच्या आवाजामुळे कोणतेही गाणे लोकप्रिय झाले असते तर तिच्या प्रत्येक गाण्याला 'ऐ मेरे वतन के लोगो ऽऽ'ची लोकप्रियता मिळाली असती, पण तसे झालेले नाही आणि कधीही होणार नाही. कारण गाण्यात आवाज सर्वात अधिक महत्वाचा कधी नसतो. पहिले महत्व असते ते गाण्यातील शब्दाना, त्यानंतर चालीला, आणि मग आवाजाला. तसे नसते तर लताच्या आवाजात अजरामर झालेले हे गाणे अनेक कार्यक्रमात मी व कवि प्रदीपने गायिल्यावर लोकांनी ते हूट आऊट केले असते. पण तसे कधीच झाले नाही. लताच्या आवाजात हे गाणे लोकांनी जेवढे उचलून धरले तेवढेच अनेक कार्यक्रमात माझ्या व प्रदीपच्या आवाजातही ते त्यानी उचलून धरले.'

## बालहट्ट आणि सी. रामचंद्र

सी. रामचन्द्र ऊर्फ अण्णा दिल्लीत आपल्या मित्राकडे मुलाबाळांसह उतरले होते. रात्री मित्राच्या आग्रहावरून अण्णांच्या जुन्या गाण्याची मैफल अण्णांनी रंगविली. पण त्यावेळी क्रेझ असलेल्या 'हाथी मेरे साथी' चित्रपटातील 'चल चल चल मेरे हाथी' हे गाणे अणांनी म्हणावे असा हट्ट त्यांच्या मुलांनी धरला पण अण्णांना ते गाणे आणि त्याची चालही माहित नव्हती. पण ते गाणे लक्ष्मीकांत–प्यारेलाल यांनी स्वरबद्ध केले आहे येवढे कळताच अण्णांनी लक्ष्मीकांतला मुंबईत रात्री ११॥/२ वाजता फोन लावला. त्याच्याकडून ते गाणे ऐकून घेतले आणि मग त्या मैफलीत ते म्हणून दाखविले. अर्थातच मुले खूष होऊन गेली.

त्यादिवशी लताबाईंच्या बरोबरच्या समझोत्याचा विषय मी त्यांच्याजवळ काढला तेव्हा देखील याच विषयावर ते माझ्याशी बराचवेळ बोलले. मला म्हणाले, 'ज्या लताने तिला मी घडवल्यानंतरही जाणूनबुजून मला अडगळीला ठेवण्याचा प्रयत्न केला त्या लताच्याकडे तरी आपणहून समझोता करण्यासाठी मी कधी जाणार नाही, प्राण गेला तरी ते शक्य नाही.'

आणि शेवटपर्यंत ते कधीच शक्य झाले नाही. मोडेन पण वाकणार नाही. या बाण्यानेच शेवटपर्यंत हा माणूस वागला.

अण्णा व लताबाई यांच्यातील मतभेद हा तसा एक गंमतीचा व काहीसा गुंतागुंतीचाच विषय होता. आणि हा गुंता कोणालाच कधी कळला नाही. त्या दोघांकडे पाहिल्यावर अनेकदा वाटायचे या दोघांचे जन्माचे हाडवैर आहे. पण हाडवैर आहे असे म्हणावे तर अनेकदा हे कळायचे नाही की, अल्बर्ट हॉलमध्ये लताबाईंनी गायिलेल्या गाण्याची जी एल. पी. आहे त्यात अनेक संगीतकारांची गाणी असली तरी अण्णांचा एकमात्र अपवाद वगळता अन्य कोणाही संगीतकाराचे नांव त्या एल. पी.त त्यांनी का घेतलेले नाही! घ्यायची म्हटली तर श्यामसुंदर, खेमचंद, नौशाद, मदनमोहन, रोशन यासारख्या अनेक संगीतकारांची नांवे त्यांना घेता आली असती. पण यापैकी कोणाकोणाचे म्हणून नांव त्यांनी घेतलेले नाही. 'ये जिंदगी उसीके है ऽऽ' गाताना मात्र इस गाने के संगीतकार है सी. रामचंद्रजी असे म्हणून एकट्या अण्णांचे नांव मात्र त्यांनी आवर्जुन घेतले आहे.

हे असे का!

कोणालाच ते कधी कळण्यासारखे नाही. अण्णांच्या बाबतीतही ते कोणाला कधी कळण्यासारखे नव्हते. आपल्याकडे गायचे बंद करून लताबाईंनी आपल्या मार्गात अडथळा आणण्याचा प्रयत्न केला आहे याबद्दल अण्णांच्या मनात जरूर राग होता. पण त्यांच्या मनात असलेल्या या रागाचे भांडवल करून कोणी लताबाईंच्या गायकीवर अनादर करण्याचा प्रयत्न केला तर तो मात्र त्याना कधीच सहन व्हायचा नाही. त्यांच्याजवळच्या मित्रांना अनेकदा याचा प्रत्यय आलाय. लताबाईंच्याविषयी त्यांच्या मनात असलेला राग आम्हाला माहीत असल्यामुळे अनेकदा 'तुमचे अमूक एक गाणे लताबाईंच्याऐवजी आशाबाई, शमशाद, गीता दत्त वा अन्य कोणी गायिकेने गायिले असते तर त्या

•

खलाशी...भीम पलासी...
संतोषी व सी. रामचन्द्र





**नवरंग • व्ही. शांताराम, सी. रामचंद्र**

गाण्याची रंगत अधिक वाढली असती, असे तुम्हाला वाटत नाही काय?' असा प्रश्न त्यांना विचारून उगाचेच डिवचण्याचा प्रयत्न आम्ही करायचो. पण याबरोबर लताबाईंच्या-विषयी त्यांच्या मनात कितीही राग असला तरी एखाद्या चवताळलेल्या सिंहाप्रमाणे ते चवताळून उठायचे आणि गरजायचे–'आशा असो, शमशाद असो वा अन्य कोणी गायिका असो. लताच्या गाण्याची सर कोणाच्याही गाण्याला कधी येणार नाही.'

दोन एक वर्षापूर्वीचा तो प्रसंग तर मी कधीच विसरणार नाही.

एक तरुण लेखक त्यावेळी 'चित्रानंद'मध्ये चित्रपटसंगीत विषयक लेख नुकताच लिहायला लागला होता. संगीताचे त्याने शिक्षण घेतलेले असल्यामुळे संगीतातील त्याला बरंच काही कळत होतं. (ऐकण्या-शिवाय संगीताशी माझा कधीच संबंध आलेला नसल्यामुळे त्यांच्याविषयी माझा तेव्हा तसा गैरसमज तर नक्कीच झाला होता.) एकदा आशाबाई या लताबाईंच्यापेक्षा श्रेष्ठ गायिका आहेत या विषयावर एक लेख लिहिण्याची कल्पना त्याच्या डोक्यात आली. ही कल्पना घेऊन तो माझ्याकडे आला. आणि मला म्हणाला. 'या लेखासाठी मला तुमची मदत हवी आहे.'

'कसली मदत!'

'हा लेख मला अगदी मुद्देसूद लिहायचा आहे. आणि त्यासाठी ओ. पी. व सी. राम-चंद्र यासारख्या संगीतकाराबरोबर चर्चा करण्याची माझी इच्छा आहे, या दृष्टीने तुम्ही मला मदत करू शकाल का?'

त्या लेखकाची ही इच्छा ऐकताच मी त्याला अण्णांच्याकडे घेऊन गेलो. त्यांच्याशी त्याचा परिचय करून दिला. आणि त्याच्या लेखाचा विषय त्यांना सांगितला. विषय ऐकून अण्णा एकदम त्या लेखकाकडे पहात राहिले. त्यांनी त्याला विचारले, 'आशा ही लतापेक्षा श्रेष्ठ गायिका आहे, असे तुमचे मत आहे का?'

'हो'

'कशाच्या आधारावर तुम्ही तुमचे हे मत बनवले आहे?'

'माझे संगीताचे शिक्षण झालेले आहे.' त्या लेखकाने आपले संगीत ज्ञान अण्णांच्यासमोर पाजळले. या बरोबर अण्णा त्याच्यावर एकदम उसळून म्हणाले, 'आशा ही लतापेक्षा श्रेष्ठ गायिका आहे असे तुमचे मत असेल तर तुम्ही घेतलेले संगीत शिक्षण व्यर्थ आहे.'

अण्णा व लताबाई यांच्यात कितीही भांडण असले तरी त्या भांडणाला दुसरी अशीही एक बाजू होती. खरं सांगायचं तर लताबाईंचा आवाज हा अण्णांचा एक वीक पॉईन्ट होता.

अण्णाच्या अंत्यदर्शनासाठी अनेक मंडळी जमली होती. बातमी ऐकली तेव्हा सारे मतभेद विसरून लताबाईही येतील असे वाटले होते. पण अंत्यदर्शनासाठी जमलेल्या मंडळीत त्या कोठेच दिसत नव्हत्या. म्हणून चौकशी केली, तेव्हा कळले त्या येऊ शकणार नाहीत. त्या मुळात भारतात नाहीतच, लंडनला गेल्या आहेत. आशाबाई सकाळीच येऊन गेल्याचं कळलं. नौशादमियाँ, अमे-रिकेत असल्यामुळे येऊ शकणार नव्हते, पण ते मुंबईत असते तर कोणत्याही परिस्थितीत आल्याशिवाय राहिले नसते, कारण नौशाद व अण्णा हे एका काळातील तुल्यबळ संगीतकार होते. त्यांच्या पूर्वी अनेक संगीतकार येथे झाले असतील. पण नौशाद व सी. रामचंद्र यांच्या युगाचा येथे उदय झाल्यानंतरच संगीतकारांना खऱ्या अर्थाने येथे स्टारपद लाभले. आणि संगीतकारांच्या नांवा-वर वितरक चित्रपटावर पैसा लावू लागले. नौशाद व अण्णा या दोघांचाही त्या काळात याबाबतीत असा महिमा होता की, त्यांच्या चित्रपटावर पैसा लावताना वितरक त्या चित्रपटात नायक कोण आहे, नायिका कोण आहे यालाही अनेकदा महत्त्व द्यायचे नाहीत. नौशाद व अण्णा यांचे संगीत हेच त्यांना चित्रपटाच्या यशाचे गमक वाटायचे. आणि अन्य कशाचाही विचार न करता त्या दोघांच्या नांवावर डोळे झाकून ते चित्रपटावर पैसे लावायचे.

नौशाद आज आले असते तर त्या काळातील आपले व अण्णांचे हे महात्म्य त्यांनी नक्कीच सांगितले असते. आणि आज चित्रपट संगीतक्षेत्रात जी जीवघेणी स्पर्धा चालली आहे त्या स्पर्धेवर घसरून त्यांच्यात व अण्णांत चालणाऱ्या निकोप स्पर्धेबाबतही ते बरेच काही बोलले असते.

एकदा नौशादमियाँनी या निकोप स्पर्धेचा मोठा हृद्य किस्सा सांगितला होता.

एकदा नौशादमियाँ आजारी पडले. त्यांना नर्व्हस ब्रेक डाऊनचे ॲटॅक येऊ लागले. लंडन-पर्यंत उपचार करूनही त्यांना गुण येईना, हे पाहून अण्णा तेव्हा हवालदिल झाले होते. या आजारातून त्यांनी बाहेर पडावे म्हणून परमेश्वराकडे त्यांनी प्रार्थना सुरू केली होती. दररोज नौशादमियाँना भेटून ते त्यांना धीर देत होते आणि त्यांना एकसारखे सांगत होते,

• पान २० वर •

● पान १७ वरून ●

'मियाजी, काहीही करून या आजारातून तुम्ही लौकर बाहेर पडले पाहिजे. मी परमेश्वराजवळ रोज तुमच्यासाठी प्रार्थना करतोय.'

नौशादमियाही यामुळे गहिवरून गेले. अण्णांना ते म्हणाले, 'तुम्ही खरं म्हणजे मला जीवदान मिळावे यासाठी परमेश्वराकडे प्रार्थना करण्याऐवजी या आजारात मला लौकरात लौकर मरण यावे यासाठी प्रार्थना केली पाहिजे.'

'ती का म्हणून ?'

'मी मेलो तर तुम्हाला कोणी स्पर्धकच उरणार नाही.'

'स्पर्धक उरला नाही तर मी एकटा काय करणार ? आज तुमची मला स्पर्धा आहे यामुळे तुमच्याबरोबर स्पर्धेत टिकले पाहिजे म्हणून मी जिद्दीने संगीत देतो. या आजारपणात तुमचं काही कमीजास्ती झालं तर ती जिद्दच माझ्यात उरणार नाही. तेव्हा काही करून तुम्हाला वाचलंच पाहिजे.'

त्या काळात एकमेकाचे पाय ओढण्याऐवजी एकमेकाच्या खांद्याला खांदा लावून ही अशी निकोप स्पर्धा चित्रपट संगीतक्षेत्रात केली जात होती. यामुळेच काळाच्या ओघात कधीच गडप न होणारे अजरामर संगीत नौशाद व अण्णा या दोघांनीही येथे निर्माण केले.

अण्णा आपल्यात आता उरलेले नाहीत. काळाने त्याना आपल्यापासून हिरावून घेतले आहे. पण अण्णाना आपल्यापासून हिरावून घेणारा तो निर्दय काळ त्यांच्या संगीताला मात्र आपल्यातून कधीच हिरावून घेऊ शकणार नाही. ते संगीत सदैव आपल्याबरोबर राहणार आहे. आणि त्या संगीतातून त्यांच्या कितीतरी आठवणी वारंवार चाळवल्या जाणार आहेत.

आज तर माझ्या अनेक आठवणी चाळवल्या-गेल्या आहेत आणि अण्णांच्याबरोबर रंगलेल्या अनेक मैफली आठवू लागल्या आहेत. त्यांच्याबरोबरच्या प्रत्येक मैफलीला संगीताची डूब असायची. आणि त्यातून त्यांच्या अनेक गाण्यांच्या जन्मकथा आम्हाला कळायच्या.

'अनारकली'तील ते एक गाणे 'जमाना यह समझा के हम पिके आये ऽ ऽ'

ते गाणे ऐकताना त्या गाण्यातील त्या उचकीविषयी आम्हाला कमालीचे कुतुहल वाटायचे. अण्णांना आम्ही विचारायचो, 'ही उचकी तुम्हाला कशी सुचली !'

अण्णा सांगायचे, 'राजेन्द्र कृष्णने हे गाणे लिहिले तेव्हा या गाण्याची चाल बांधत आम्ही साईप्रसादवर पित बसलो होतो. 'अनारकली' दारू पिऊन पडद्यावर गाणे गाते असा हा प्रसंग. पण अनेक तऱ्हेने गाण्याची चाल बांधूनही त्या गाण्यात दारूचा 'इफेक्ट' काही आम्हाला निर्माण करता येत नव्हता. एवढ्यात त्या मैफलीत आमच्याबरोबर पिणाऱ्या हमीद भट्टला 'उचकी' लागली. आणि त्याची ती 'उचकी' पकडूनच या गाण्यात मी दारूचा तो इफेक्ट नेमका निर्माण केला.'

याच 'अनारकली'मधील आणखी एक गाणे 'यह जिंदगी उसकी है, जो किसी का हो गया ऽ ऽ'. अण्णांनी एकदा जाहीरपणे सांगितले, 'मूर्तीमंत भीती उभी ऽ ऽ' या नाट्यपदावरून या गाण्याची चाल मी सरळ, सरळ उचलेली आहे. हे ऐकताच नाटकातील अनेक जुनी मंडळी त्यांना भेटली व म्हणाली, 'मूर्तीमंत भीती उभी ऽ ऽ' या गाण्याशी तुमच्या गाण्याच्या चालीचा काही संबंध नाही. तुमच्या चालीहून ती चाल वेगळी आहे.'

त्या मंडळींनी मूळ चाल त्यांना गाऊन दाखवली. तेव्हा आपल्या गाण्याच्या चालीशी 'मूर्तीमंत भीती उभी ऽ ऽ' या गाण्याच्या चालीशी काही संबंध नाही ही गोष्ट त्यांच्याही लक्षात आली. मग ही चाल त्यांना कशी काय सुचली होती ?

त्याचीही एक मोठी गंमतीदार कथा आहे. अण्णानी 'मूर्तीमंत भीती उभी ऽ ऽ' ची मूळ चाल कधीच ऐकली नव्हती. पण ते लहान होते तेव्हा त्याचे वडील आंघोळ करताना ते गाणे ज्या चालीत गायचे त्याची चाल त्यांनी ऐकली होती. ती चालच त्यांच्या डोक्यात होती. व त्यांच्या वडिलानी आपल्या बुद्धीनुसार त्या गाण्याला जी चाल लावली होती त्या चालीतूनच अण्णाना अजरामर बनवणाऱ्या 'ये जिंदगी उसीकी है ऽ ऽ' या गाण्याच्या चालीचा जन्म झाला होता.

'अलबेला'तील 'धीर से आजारे अँखियन मे, निंदिया आजा रे आजा ऽ ऽ' या लताबाईंच्याबरोबर त्यांनी गायिलेल्या लोरीचा किस्साही अनेकदा अण्णा रंगवून सांगायचे. या लोरीसाठी लताबाईंच्याबरोबर तलतचा आवाज घेण्याचा विचार अण्णानी सुरुवातीला केला होता. आणि त्याचा आवाज डोळ्यासमोर ठेवूनच त्या गाण्याची चाल त्यानी बांधली होती. पण रेकॉर्डिंगच्या वेळी तलत उपलब्ध नव्हता. आणि तो उपलब्ध होईपर्यंत थांबायचे म्हटले तर चित्रणाचा सारा कार्यक्रम चौपट होऊन जाणार होता, यामुळे अण्णांचा नाईलाज झाला. आणि तलतचा आवाज डोळ्यासमोर ठेवून बांधलेले ते गाणे लताबाईंच्याबरोबर त्यांनी स्वतःच गायिले. गाण्याने अलोट लोकप्रियता मिळवली.

'धीरसे आजारे आखियन मे, निंदिया आजारे आजाऽऽ' या गाण्याच्या त्या लोकप्रियतेच्या काळातच एकदा बडे गुलाम अलीखाँशी अण्णांची भेट झाली. ते त्यांना ओळखत नव्हते. पण त्यांच्याबरोबर असलेल्या लताबाईंना मात्र ओळखत होते. त्या गाण्याबद्दल लताबाईंना त्यांनी शाबासकी दिली. व त्यांची पाठ थोपटीत ते त्यांना म्हणाले, 'बेटी तुमने क्या खूब गाया है और बनानेवालेने इस गानेकी तर्ज भी कितनी खूब बनायी है,

●

मिस्टर जॉन...बाबाखान!
सी. रामचंद्र व राजेंद्रकृष्ण



लेकीन इतनी अच्छी तर्ज बनानेवाला ये आदमी इतना बेवकूफ कैसा है, यह बात मेरी समझ मे नही आ रही है, तुम्हारे साथ इस गानेमे उसने मर्द की आवाज इतनी भद्दी कैसी ली है !'

अण्णांच्या आवाजाबाबतचा बडे गुलाम अलीखाँचा हा अभिप्राय तसा चुकीचा नव्हता. कारण त्यांचा आवाज 'धीरेसे आजारे ऽऽ' सारख्या हळुवार गाण्याऐवजी लाईट व उडत्या गाण्यातच सूट होणारा होता. रफी, मन्ना डे, तलत या पार्श्वगायकांच्या तुलनेत एक गायक म्हणून त्यांचा विचार करावयाचा झाला तर त्यांच्या आवाजाला निश्चितपणे काही मर्यादा होत्या. पण या मर्यादेत राहूनही एक गायक म्हणून त्या काळात हिंदी चित्रपट संगीतावर त्यांनी स्वतःचा असा काही ठसा उमटवला होता की, 'ओ बेटाजी, ओ बाबूजी' (अलबेला), 'मै हूँ एक खलासी, मेरा नाम है भिमपलासी' (सरगम), 'ऐसी तिरछी नजरवालों से तो बचके रहेना जी' (शहनाई), 'तू ठेर अभी मैं आया' (समेला), 'दिल का यह इंजन शिटियाँ मारे' (उस्ताद पेद्रो), 'अरे मारवाडी कितना लंबाचवडा टोपा पहेना है रे' (निराला) यासारख्या काही विशिष्ट गाण्यात त्यांच्याशिवाय अन्य कोणाही गायकाच्या आवाजाची आपणाला कल्पना करता येणार नाही. या गाण्यांच्या लोकप्रियते-मुळे संगीतकाराबरोबरच 'चितळकर' या नांवाने पार्श्वगायक म्हणून स्वतःचे असे स्वतंत्र स्थान त्यांनी येथे निर्माण केले होते. स्वतःच्या चित्रपटातील गाणी तर ते गातच होते पण त्यांच्या गाण्यांना लाभणाऱ्या लोकप्रियते-मुळे इतर संगीतकारही आपल्या चित्रपटात त्यांचा आवाज वापरण्याचा मोह टाळू शकत नव्हते. एस. डी. बर्मन ( आठ दिन, शिकारी, चालिस बाबा एक चोर ), रोशन ( बारात ), उषा खन्ना ( फासला ) यासारख्या काही संगीतकारांसाठीही ते तेव्हा गात होते. आणि दिलीपकुमार (आझाद), देव आनंद (बारिश), राज कपूर (सरगम), अशोककुमार (संग्राम), यासारख्या आघाडीच्या नायकांच्या तोंडीही त्यांचा आवाज ऐकू येत होता. एक गायक म्हणून चित्रपटव्यवसायात त्यानी मिळवलेले हे फार मोठे यश होते.

एक संगीतकार म्हणून तर त्यांच्या संगीताची रेंज जबरदस्त होती. अण्णांच्या अंत्यदर्शनाला येणाऱ्या मंड-ळींची गर्दी एकसारखी वाढतच होती. अण्णांच्या अनेक चित्रपटांची गाणी लिहिणारे गीतकार राजेन्द्र कृष्ण माझ्या शेजारीच उभे होते. आणि ते अण्णांच्या संगीताच्या या रेंजवरच माझ्याशी बोलत होते. पाश्चिमात्य संगीताची आपल्या चित्रपटात आपण कल्प-नाही करू शकत नव्हतो त्या काळात या माणसाने काळापुढे झेप घेऊन पाश्चिमात्य संगीत आपल्या चित्रपटात आणले होते. पण ते आणताना आजच्या संगीतकाराप्रमाणे तो पूर्णपणे पाश्चिमात्य संगीताच्या आहारी मात्र



'इना मिना डिका...'
आशा भोसले, सी. रामचंद्र

●

कधी गेला नव्हता. पाश्चिमात्य संगीताच्या जोडीला आपले भारतीय संगीतही आपल्या चित्रपटात त्याने जोपासले होते, संगीताच्या बाबतीत या माणसाचे व्यक्तिमत्व तसे दुहेरी होते. यामुळे अनेकदा तो दोन टोकाना जाऊन संगीत द्यायचा.'

आणि हे तसं खोटं नव्हतं. एका बाजूला तो 'मौबासा'ची आरोळी फोडायचा. आणि त्याच वेळी दुसऱ्या बाजूला 'जब दिल को सताये गम, तू छेड सखी सरगम ऽ ऽ' (सरगम)ची हळूवार सरगम छेडून तो तुमच्या हृदयाला हात घालायचा. एका बाजूला तो 'इना मिका डिका ऽऽ' द्यायचा तर दुसऱ्या बाजूला 'चंदनीया तरस करे' (आशा). एका बाजूला 'मेरे पिया गये रंगून, किया है वहाँसे टेलिफून ऽऽ' तर दुसऱ्या बाजूला 'हम ना तुम्हे भुलायेंगे ओ ठके जानेवाले' (पतंगा). एका बाजूला 'शिन शिनाकी बुबलाबू' तर त्याच वेळी दुसऱ्या बाजूला 'तुम क्या जानो, तुम्हारी याद में हम कितना रोये' (शिन शिनाकी बुबलाबू), एका बाजूला 'मोहे लागे सारा जग फिका फिका ऽऽ' तर त्याच वेळी दुसऱ्या बाजूला 'ए प्यार तेरी दुनियासे हम बस इतनी निशानी लेके चले' (झांजर).

एकाच चित्रपटात दोन टोकांची ही गाणी ऐकताना एकच माणूस दोन टोकावर जाऊन हे असे संगीत देतोय यावर सहजासहजी विश्वास बसायचा नाही इतके अण्णांच्या संगीताचे स्वरुप परस्पर विरोधी होते. पण दोन टोकावर राहूनही एकमेकात ते पुरते मिसळून गेले होते. हे देखील त्यांच्या संगीताचे तसे एक वैशिष्टयच होते.

अण्णांच्या संगीताची वैशिष्टय सांगायची झाली तर ती अनेक सांगता येतील. कारण

ज्यांच्या संगीताला कोणतीही मर्यादा नाही असा हा एक अमर्याद संगीतकार होता. पण एक माणूस म्हणून विचार करावयाचा झाला तरी एका अमर्याद माणसांच्या मालिकेतच अण्णांची गणना आपणाला करावी लागेल.

ज्याला आपण खऱ्या अर्थाने एक अमर्याद जीवन म्हणू शकू असे जीवनच शेवटपर्यंत हा माणूस जगला. यामुळे चित्रपट-क्षेत्रातून बाहेर फेकले गेल्यानंतरही या माणसावरील लोकांचे प्रेम कमी झाले नाही. लोकांनीही शेवटपर्यंत या माणसावर अमर्याद प्रेम केले. त्यांच्या अंत्यदर्शनाला जमलेला अमर्याद जनसमुदाय हा या प्रेमाचेच द्योतक होते.

या जनसमुदायापैकीच कोणीतरी मला सांगितले, 'अण्णांना आदरांजलि वाहण्यासाठी आज एकजात सारी रेकॉर्डिंग रुम्स बंद आहेत.'

गेल्या दहाएक वर्षांत तरी अण्णांनी एकाही चित्रपटातील गाण्याचे रेकॉर्डिंग कधी केलेले नाही. त्यांच्यासाठी एकजात सारी रेकॉर्डिंग रुम्स एक दिवस का होईना बंद राहतात हे तसं थोडसं विचित्रच नाही का? कारण काळ कोणासाठी थांबत नसतो, पण अमर्याद माणसापुढे काळाला देखील काही क्षण हतबल व्हावे लागते. आणि आपले अस्तित्व विसरून काही क्षण का होईना तो थांबतो. चित्रपटसंगीत क्षेत्रातील आजचा दिवसही अण्णांच्यासमोर आज असाच झुकून थांबला होता. गेल्या दहा–बारा वर्षात अण्णांनी रेकॉर्डींग रुममधील एकाही वाद्याला हात लावला नसला तरी ती वाद्येदेखील आपापल्या रेकॉर्डींग रुममध्ये आज म्लान होऊन पडली होती. माझी खात्री आहे ती देखील अण्णांच्या संगीताचे त्यांच्यातून गेल्या अनेक वर्षात तसे जादूभरे स्वर निर्माण झाले नाहीत आणि यापुढे कधीच निर्माण होऊ शकणार नाहीत या दुःखात त्यावेळी रडत असतील.

अंत्यदर्शनासाठी जमलेल्या गर्दीत माझ्या-मागे उभी असलेली एक स्त्री अशीच रडत होती ती मला सांगत होती, 'सकाळी अण्णांच्या निधनाची बातमी ऐकली आणि खारहून मी सरळ धाव घेतली. त्यांची माझी ओळख नसल्यामुळे त्यांचा पत्ताही मला माहीत नव्हता. तरीही तो मी शोधून काढला. कारण ज्या माणसाने आपल्या संगीताने मला रिझवले त्या माणसाचे शेवटचे दर्शन मला घ्यायचे होते.'

दहाटे के. ई. एम.मध्ये पुण्याहून धावत

## लंडनचा ज्योतिषी

दोन महिन्यापूर्वी सी. रामचंद्र लंडनला गेले होते. त्यावेळी एका ज्योतिष्याशी त्यांची भेट झाली होती. त्या ज्योतिषाने सी. रामचंद्रना सांगितले होते, 'डिसेंबर अखेर तुम्हाला खूप उमेद वाटेल–' भविष्यकाळ पुन्हा उजळणार असे वाटू लागेल; पण तुमच्या हाती मात्र काही लागणार नाही.'

२२ डिसेंबरला जेव्हा सी. रामचंद्र यांना के. ई. एम. मध्ये नेण्यात आले त्यावेळी सी. रामचंद्रांनी आपल्या पत्नीला हे भविष्य सांगितले व म्हटले की, 'ते भविष्य बहुतेक खरे होणार असे दिसते आहे.'

आणि ते भविष्य दुर्दैवाने खरे ठरले आहे.

**नंबर फिफ्टी फोर, हाऊस ऑफ बाम्बू (घरकुल)**

**प्रभाकर जोग, अरूण सरनाईक, सी. रामचंद्र, रंजिता, शं. ना. नवरे, राजा ठाकूर**



22-12-89
Hope

झालेल्या तरुणाचे तरी अण्णांशी तसे काय नाते होते ! तो केवळ अण्णांचा एक चाहता होता. पण आजारपणात अण्णांना रक्त हवे आहे हे कळल्यावर आपलं रक्त त्यांना उपयोगी पडत असेल तर ते त्यांना द्यावे म्हणून पुण्याहून तो धावत आला होता. पण अण्णांची प्राणज्योत तर पूर्वीच मालवलेली होती.

बावीस डिसेंबरला अण्णांना के. ई. एम्. मध्ये दाखल करण्यात आले तेव्हापासून त्यांच्यावर प्रेम करणारी अनेक तरुण मंडळी त्यांना रक्त देण्यासाठी दवाखान्यात धावत होती. के. ई. एम्. मधील अनेक तरुण डॉक्टर मंडळीही त्याना आपले रक्त देऊन वाचवण्याचा प्रयत्न शर्थीने करीत होती. पण दुर्दैव अण्णांचे व त्यांच्या चाहत्यांचेही, शर्थीचे प्रयत्न करूनही कोणाला त्याना वाचवता आले नाही. पण या **निमित्ताने** अण्णांच्या चाहत्यांचे त्यांच्यावरील **अमर्याद** प्रेम मात्र पाहायला मिळाले.

दोन जानेवारीला अण्णांना पाहायला के. ई. एम्.मध्ये गेलो होतो तेव्हा त्यांच्या पत्नीने–बेनने त्यांच्या एका चाहत्याचा सांगितलेला किस्सा तर मोठा हृद्य होता. अण्णांना पाहायला येताना तो स्टीलची दोन भांडी घेऊन त्यांना भेटायला आला होता. अण्णा तेव्हा कोमातच होते. आणि बेन तर त्याला ओळखतच नव्हत्या. यामुळे ती भांडी त्याच्याकडून घ्यायची त्याना संकोच वाटला.

त्या त्याला म्हणाल्या, 'मी तुम्हाला ओळखत नाही.'

'अण्णाही मला ओळखत नाहीत. पण त्यांचे माझ्यावर फार मोठे उपकार आहेत. आज मी जो काही आहे तो त्यांच्यामुळेच आहे. पंचवीस वर्षापूर्वी माझ्या जीवनात असा एक प्रसंग निर्माण झाला होता की जगण्याची इच्छाच माझ्यात उरली नव्हती. आत्महत्या करायचा निर्णय घेऊन रात्री मी विषाचा पेला भरला होता. एवढ्यात रेडिओवर अण्णांचे एक गाणे लागले. त्या गाण्याने मला अशी काही धुंदी चढवली की त्या धुंदीत मला झोप कधी लागून गेली हे कळलेच नाही. तो विषाचा पेला तसाच पडून राहिला. सकाळी जाग आली तेव्हा रात्रीचा आत्महत्येचा माझा विचार बदलला होता. त्याक्षणी अण्णांचे ते गाणे लागले नसते तर दुसरे दिवशीची ती सकाळ मी कधीच पाहिली नसती. पण अण्णांच्या एका गाण्याने मला वाचवले. आज मी तुम्हाला भेटतोय तो अण्णांच्या त्या एका गाण्यामुळेच. अण्णांचे माझ्यावर हे फार म्हणजे फार मोठे उपकार आहेत.

गेल्या दहा वर्षात अण्णा, चित्रपट संगीतक्षेत्रात तसे 'ॲक्टिव्ह' नसेल तरी त्यांच्या या संगीतानेच त्याना जिवंत ठेवले होते. आणि अण्णा आता आपल्यात राहिलेले नसले तरी हे संगीतच यापुढे त्याना जिवंत ठेवणार आहे. कारण अण्णांचे संगीत ज्याच्या लोकप्रियतेला कधीच अंत नाही असे अजरामर संगीत आहे. आणि ते अण्णाशी जमलेले त्याचे नाते सदैव अतुटच ठेवणार आहे. हे नाते 'भुलाये न बने' असे आहे. कोणाही अमर्याद माणसाशी जमलेले आपले नाते हे असेच 'भुलाये न बने' असते. यामुळे अण्णांच्या बाबतीत बोलताना यापुढे आपणाला त्यांच्याच 'पतंगा' या चित्रपटातील एक गाणे आठवून म्हणावे लागणार आहे 'हम ना तुम्हे भुलायेंगे, ओ रुठ के जानेवाले दुनिया को भी हम भुलायेंगे ऽऽ'

खरंच जगाचाही विसर पडावा, पण या माणसाचा कधीच विसर पडू नये अशी एक दिलखुलास प्रसन्नता या माणसात होती. ती त्यांच्या संगीतात होती, त्यांच्याबरोबर रंगणाऱ्या मैफलीत होती, त्यांच्या व्यक्तिमत्वात होती, त्यांच्या चेहऱ्यावर खळखळणाऱ्या हास्यात होती.

रात्री टी. व्ही. वर राजेन्द्रकृष्णनी त्यांना वाहिलेल्या आदरांजलीत त्यांचा एक फोटो दाखवण्यात आला. त्या फोटोतही अगदी तेच खळखळणारे हास्य त्यांच्या चेहऱ्यावर विलसत होते. हे खळाळणारे हास्य चेहऱ्यावर घेऊन अण्णा एखाद्या मैफलीत बियरची बाटली फोडू लागले की त्या बाटलीतून फसकन् वर येणारा फेस अण्णांच्या चेहऱ्यावरील खळाळणाऱ्या त्या मोहक हास्यामुळे आम्हाला अधिक मोहक वाटायचा. यापुढेही अनेकजण आमच्यासमोर बिअरच्या बाटल्या फोडतील. पण अण्णांच्या चेहऱ्यावरील ते खळाळणारे हास्य आपल्यात आता उरलेले नसल्यामुळे बिअरच्या बाटलीतून फसकन् बाहेर येणाऱ्या त्या फेसाला पूर्वीची शान काही आता येणार नाही. यापुढेही अनेक मैफली आमच्या आयुष्यात रंगतील; पण त्या मैफलीतही आता पूर्वीचे चैतन्य उरणार नाही. कारण अण्णा म्हणजे मैफलीतील एक चालतं–बोलतं चैतन्य होतं. ते चैतन्य त्यांच्याबरोबरच संपले आहे. आणि मैफल आता पोरकी झाली आहे.

